**राज्य उत्पादन शुल्क विभागाचे संगणकीकरण व आधुनिकीकरण, ई प्रशासन धोरण इ. ची अंमलबजावणी याकरिता प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. एमआयएस -११२२/प्र.क्र.२७१/राउशु-२**

मंत्रालय विस्तार ५ वा मजला, दालन क्र.५५३,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२३

<u>संदर्भ</u> : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. सीओएम-१००१/१७४/०१/३९, दि. २९.१०.२००१

२) शासन शुद्धीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग सीओएम१००१/प्र.क्र. १७४/०१/३९, दि. २८.०३.२००५

३) शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान संचालनालय (सा.प्र.विभाग) क्र. मातंसं-नस्ती-२०१०/प्र.क्र. ३४/३९, दि.१८.०६.२०१०

४) शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान संचालनालय (सा.प्र.विभाग) क्र. मातंसं-२०११/प्र.क्र.१२५/३९, दि. २३.०९.२०११

५) आयुक्त, राउशु यांचे क्रमांक राउशु/कार्या-८/संवस/आढावा बैठक/२०२२-२३/१०८, दि. १२.१०.२०२२

**<u>प्रस्तावना</u> :-**

शासकीय कामकाजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्यासाठी कार्यपद्धती विहीत करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक २९.१०.२००१ रोजी प्रसिद्ध केलेल्या शासन निर्णयानुसार, हार्डवेअर कंपोनंट्सची खरेदी रु. ५.०० लक्ष पेक्षा जास्त व सॉफ्टवेअर कंपोनंटची खरेदी रु. २.०० लक्ष पेक्षा जास्त असल्यास असे संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी संबंधित विभागांनी संबंधित प्रधान सचिव/सचिव यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करणे आवश्यक आहे. तसेच, माहिती व तंत्रज्ञान विभागाने संदर्भ क्र. ३ येथील दि. १६.०६.२०१० च्या शासन निर्णयाद्वारे, मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या अर्धा टक्के निधी ई-गव्हर्नन्ससाठी राखीव ठेवणे व सदरचा निधी खर्च करताना प्रकल्प अंमलबजावणी समितीची मान्यता घेण्याबाबतचे निर्देश दिले आहेत. तसेच, माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक २३.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्याचे ई-प्रशासन धोरणानुसार ई-प्रशासन प्रकल्पांवर देखरेख करण्याची जबाबदारी प्रकल्प अंमलबजावणी समितीवर ठेवण्यात आली आहे. त्यानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य उत्पादन शुल्क विभागाचे संगणकीकरण व आधुनिकीकरण, ई प्रशासन धोरण इ. ची अंमलबजावणी आणि ई प्रशासन धोरणांतर्गत असलेल्या प्रकल्पांवर देखरेख करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे : -

| अ.क्र. | समितीचे सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, राज्य उत्पादन शुल्क विभाग. | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, महिती व तंत्रज्ञान विभाग अथवा त्यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| ५ | आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य |
| ६ | उप सचिव/सह सचिव, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०२२२१६५८२०६५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ATUL RAMESH DHANE

Digitally signed by ATUL RAMESH DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80691c59fb12e0c7ed4f69faa3289470efe99ad738c86ae8aec7915dad6eb4fe, pseudonym=E694E355D44989A7FFCE8C3D2E85D9635F6A1654, serialNumber=EF31EEEB1D87F5C24C081A37E9039778F0C48A99E180F6C8AA19B502D19FAF82, cn=ATUL RAMESH DHANE
Date: 2023.02.22 17:04:06 +05'30'

**(अतुल र. ढाणे)**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (राज्य उत्पादन शुल्क), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई -३२.
५. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई -३२.
६. उपसचिव, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
७. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई -२३.
८. राउशु-२ (संग्रहार्थ).